**श्री. सागर भुपाल माळगे, सहाय्यक सरकारी अभियोक्ता, गट "अ" यांचा परिविक्षाधीन कालावधी समाप्त करण्याबाबत...**

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग,**
**शासन आदेश क्रमांक :- डीपीपी-१२२०/प्र.क्र.२०१/पोल-१०,**
मुख्य इमारत, दुसरा मजला,
मादाम कामा मार्ग,हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय,मुंबई ४०० ०३२.
दिनांक :-११ फेब्रुवारी, २०२२

**वाचा :-**

१) शासन आदेश, गृह विभाग, क्रमांक डीपीपी-२०१३/प्र.क्र.६०/पोल-१०, दिनांक २८.०५.२०१३.

२) संचालक, अभियोग संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांचे पत्र क्रमांक :- सअआस्था/ ८९/ १२०२/ २०२०, दिनांक २४.१२.२०२०.

३) संचालक, अभियोग संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांचे पत्र क्र.सअवेवा/१०५/१०५५/२०२१, दि.१७.०७.२०२१.

४) सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्र.परिवी-२७१५/ प्र.क्र.३०२/ आठ, दि.२९.०२.२०१६

५) शासन परिपत्रक, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक:- परिवी-२७१५/ प्र.क्र.२०३/आठ, दिनांक २५.०८.२०१५

**प्रस्तावना :-**

संदर्भ क्र.१ येथील शासन आदेशाद्वारे गृह विभागाच्या संनियंत्रणाखालील अभियोग संचालनालयांतर्गत सहाय्यक सरकारी अभियोक्ता संवर्गामध्ये श्री. सागर भुपाल माळगे यांची सहाय्यक सरकारी अभियोक्ता म्हणून दोन वर्षाच्या परिविक्षाधीन कालावधी करिता विहित केलेल्या अटी व शर्तीस अधीन राहून प्रथम नियुक्ती करण्यात आली होती.

संदर्भ क्र.२ व ३ येथील पत्रान्वये श्री. सागर भुपाल माळगे यांचा परिविक्षाधीन कालावधी पूर्ण केला असल्याने त्याबाबतचे आदेश पारित करण्याची विनंती केली आहे.

त्यास अनुसरुन ज्याअर्थी, संदर्भ क्र.४ येथील सामान्य प्रशासन विभागाच्या शासन निर्णयान्वये शासन सेवेतील अधिकारी / कर्मचारी यांचा परिविक्षाधीन कालावधी समाप्त करण्याबाबत सुधारित मार्गदर्शक सूचना पारित करण्यात आल्या असून, त्याअर्थी श्री. सागर भुपाल माळगे यांचा परिविक्षाधीन कालावधी समाप्त करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन आदेश :-**

सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय दि.२९.०२.२०१६ मधील तरतूद क्र.१(३)(ब) नुसार परिविक्षाधीन कालावधीत नैमितिक रजेव्यतिरिक्त कोणत्याही स्वरुपाची रजा उपभोगल्यास उमेदवारांचा परिविक्षाधीन कालावधी रजेच्या कालावधी इतका वाढविण्यात येतो.

२. श्री. सागर भुपाल मळगे यांनी परिविक्षाधीन कालावधी समाप्त करण्यासाठी आवश्यक असणाऱ्या बाबी समाधानकारकरित्या पूर्ण केल्या असल्याने संदर्भ क्र.२ व ३ अन्वये संचालक, अभियोग संचालनालय यांनी परिविक्षाधीन कालावधी समाप्त करण्याच्या विनंतीस अनुसरुन,

त्यांचा परिविक्षाधीन कालावधी या परिच्छेदातील खालील तक्त्यात त्यांच्या नावासमोर दर्शविलेल्या स्तंभ क्रमांक पाच येथे नमूद रजा कालावधी एवढा परिविक्षाधीन कालावधी वाढविण्यात येत असून, नमूद दिनांकास समाप्त करण्यात येत आहे. तसेच त्यांची सेवा नियमितपणे पुढे चालू ठेवण्याचा दिनांक स्तंभ क्रमांक सहामध्ये नमूद करण्यात येत आह.

| अ.क्र. | नाव व पदनाम | रुजू दिनांक | उमेदवाराने उपभोगलेल्या रजा | परिविक्षाधिन कालावधी समाप्त केल्याचा दिनांक | पदावरील सेवा नियमितपणे पुढे चालू ठेवण्याचा दिनांक |
|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ |
| १ | श्री. सागर भुपाल माळगे, सहाय्यक सरकारी अभियोक्ता, खेड | १३.०६.२०१३ | ३३ दिवस | १६.०७.२०१५ (म.नं) | १७.०७.२०१५ (म.पू) |

संचालक, अभियोग संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांना कळविण्यात येते की, सदर अभियोक्त्यांच्या पुढील वेतनवाढी मुक्त करण्याच्या अनुषंगाने नियमानुसार तात्काळ उचित कार्यवाही संचालक, अभियोग संचालनालय यांनी करावी.

३. सदर शासन आदेश सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्रमांक परिवि-२७१५/प्र.क्र.३०२/आठ, दिनांक २९ फेब्रुवारी, २०१६ मधील तरतुदींन्वये व सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय परिवी-२७१५/प्र.क्र.२०३/आठ, दिनांक २५ ऑगस्ट,२०१५ अन्वये प्रशासकीय विभाग प्रमुखास प्रदान केलेल्या अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात अला असून त्याचा संकेतांक २०२२०२१११२४०३५४३२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Tushar Dilip Rathod

Digitally signed by Tushar Dilip Rathod
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=HOME DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=e7e9706be693397ead11bd0e0b8fbaec45488529c8b57466dbf3e7c095089c08, pseudonym=E5959DAF1A16023D678D1801FC611F35E4BD65FF, serialNumber=B88BABB31CB2C1163B5A1E41E86D809272FEA914814734600D0B42642848C06F, cn=Tushar Dilip Rathod
Date: 2022.02.11 12:42:50 +05'30'

**(तुषार दि. राठोड)**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१.संचालक, अभियोग संचालनालय, खेतान भवन, ५ वा मजला, सदनिका क्रमांक ८, चर्चगेट, मुंबई ४०० ०२१.
२.महालेखापाल (लेखा व परीक्षा) - १/२, महाराष्ट्र, मुंबई/नागपूर.
३.महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) - १/२, महाराष्ट्र, मुंबई/नागपूर.
४.अधिदान लेखा अधिकारी, मुंबई.
५.निवासी लेखा अधिकारी, मुंबई.
६.श्री.सागर भुपाल माळगे, सहाय्यक सरकारी अभियोक्ता (संचालक, अभियोग संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांच्यामार्फत)
७.निवड नस्ती/पोल-१०